सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या संगणकीकरण प्रकल्पासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...

आधार सिडींग व डाटा एंट्रीसाठी

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साविबा-२०१५/प्र.क्र.६५/सं.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०१ मार्च, २०१७

वाचा -

१) शासन पत्र क्रमांक- साविबा २०१५/प्र.क्र.८/सं.क., दि.३ फेब्रुवारी २०१५
२) शासन ज्ञापन क्रमांक-संकीर्ण २०१५/प्र.क्र.६५/सं.क., दि.३० एप्रिल २०१५
३) शासन निर्णय क्रमांक-साविबा २०१२/प्र.क्र.४१/सं.क., दि.२५ ऑगस्ट २०१५
४) शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण २०१५/प्र.क्र.६५/सं.क., दि.३१ ऑगस्ट २०१५
५) शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण २०१५/प्र.क्र.६५/सं.क., दि.१० फेब्रुवारी २०१६
६) शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण २०१५/प्र.क्र.६५/सं.क., दि.५ मार्च २०१६

**शासन निर्णय:-**

राज्यात सुरू असलेल्या सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण या प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांचा आधार क्रमांक/आधार नोंदणी क्रमांक, बँक खाते क्रमांक व मोबाईल क्रमांक इ. माहिती शिधापत्रिकांच्या डाटाबेसमध्ये समाविष्ट करण्यासाठी क्षेत्रीय कार्यालय स्तरावर डाटा एंट्री एजन्सीची नेमणूक करण्यात आलेली आहे. या डाटा एंट्री एजन्सीमार्फत केलेल्या आधार सिडींगच्या कामासाठी वरील संदर्भाधीन क्रमांक २, ४, ५ व ६ अन्वये शासनाने सर्व क्षेत्रीय कार्यालयांना एकूण रू. ११.२२ कोटी एवढा निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी हा उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ अन्वये दिलेल्या निर्देशाच्या अधीन राहून वितरीत करण्यात आलेला असून आता देखील सदर निधी या शासन पत्रातील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

२. या आदेशान्वये क्षेत्रीय कार्यालयांना खाली नमूद केल्याप्रमाणे एकूण रू. ०६,६७,००,०००/- (रूपये सहा कोटी सदुसष्ट लाख फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये लाखांत)

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | मंजूर निधी | अ.क्र. | जिल्हयाचे नांव | मंजूर निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | अ परिमंडळ, परेल | २६.०० | २० | कोल्हापूर | २१.०० |
| २ | ड परिमंडळ, अंधेरी | २४.०० | २१ | औरंगाबाद | १६.०० |
| ३ | ई परिमंडळ, वडाला | ३७.०० | २२ | जालना | ०६.०० |
| ४ | फ परिमंडळ, ठाणे | ५०.०० | २३ | परभणी | ०८.०० |
| ५ | ग परिमंडळ, कांदिवली | २८.०० | २४ | हिंगोली | ०८.०० |
| मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्र | | १६५.०० | २५ | बीड | १५.०० |
| ६ | पालघर | २९.०० | २६ | नांदेड | ०५.०० |
| ७ | ठाणे | ०८.०० | २७ | लातूर | ०५.०० |
| ८ | रायगड | ३०.०० | २८ | उस्मानाबाद | ०९.०० |
| ९ | रत्नागिरी | ०९.०० | २९ | अमरावती | ०६.०० |
| १० | सिंधुदूर्ग | ०९.०० | ३० | अकोला | ११.०० |
| ११ | नाशिक | २९.०० | ३१ | वाशिम | ०८.०० |
| १२ | अहमदनगर | १७.०० | ३२ | यवतमाळ | २२.०० |
| १३ | जळगांव | १४.०० | ३३ | बुलढाणा | १२.०० |
| १४ | धुळे | १०.०० | ३४ | नागपूर | २९.०० |
| १५ | नंदुरबार | ०४.०० | ३५ | वर्धा | १०.०० |
| १६ | पुणे | ५३.०० | ३६ | भंडारा | ०४.०० |
| १७ | सातारा | ०९.०० | ३७ | गोंदीया | ०४.०० |
| १८ | सांगली | १४.०० | ३८ | चंद्रपूर | १७.०० |
| १९ | सोलापूर | ४४.०० | ३९ | गडचिरोली | ०७.०० |
| | | | | **एकूण** | **६६७.००** |

३. हा निधी वितरीत करण्यासाठी रू. ०६,६७,००,०००/- (रूपये सहा कोटी सदुसष्ट लाख फक्त) एवढी तरतूद वितरित करण्यात येत असून हा निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र.एम-३, ३४५१- सचिवालय आर्थिक सेवा, (००) (०९०) सचिवालय, (००) (०५) लक्ष्यित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण (राज्य हिस्सा) (योजनातंर्गत) (दत्तमत) (३४५१ ३०९२) १७, (संगणक खर्च) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. तसेच वरील खर्च शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून खर्च करण्यात यावा व वित्तीय बाबींच्या अनुषंगाने लागू असणाऱ्या सर्व तरतुदींचे पालन व्हावे.

४. वरील संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण या प्रकल्पातील Component-I व Component-II अशा दोन टप्प्यांमधील एकूण रू.१९८.६४ कोटी एवढ्या अंदाजित खर्चास उच्चाधिकार समितीने मान्यता दिलेली आहे. सदर शासकीय आदेश या मान्यतेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११७१७३१६७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahadeo Giridhari Jogdand

Digitally signed by Mahadeo Giridhari Jogdand
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfa03bccc5d29403a28c83f3ad74b7ce2feb85e634f155ccc685e72ede68707, cn=Mahadeo Giridhari Jogdand
Date: 2017.03.04 10:55:13 +05'30'

( म. गि. जोगदंड )
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव,
५. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१०.महालेखापाल, महराष्ट्र-२, नागपूर,

११.सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव,
१२.सर्व विभागीय आयुक्त,
१३.नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गोवा),मुंबई,
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ,
१७.सर्व उप आयुक्त (पुरवठा),
१८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१९.सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२०.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२१.उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२२.सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
२३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
२४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
२५.मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
२६.सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
२७.सर्व विरोधी पक्षनेते.
२८. निवड नस्ती (सं.क.).